खामकरवाडी (ता.राधानगरी, जि.कोल्हापूर)
नळ पाणी पुरवठा योजनेस सुधारित प्रशासकीय
मान्यता देण्याबाबत.

# महाराष्ट्र शासन
## पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग
## शासन निर्णय क्रमांकः ग्रापापु २४०८/ प्र.क्र.३६३ / पा.पु.१७

हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा मार्ग,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
तारीख: ०५ जून, २०१५

**वाचा**

१) शासन निर्णय क्र. ववेका- १०९६/सीआर- २०६ (अ)/पापु-१०, दि. २० मे, १९९६
२) कार्यकारी अभियंता, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, बांधकाम विभाग क्र.२, कोल्हापूर यांचे पत्र क्रमांकः तांशा-२/२१७७/२००८, दि.२१/१०/२००८
३) अधीक्षक अभियंता, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, नागरी व ग्रामीण योजना मंडळ, कोल्हापूर यांचे पत्र क्रमांकः तांशा-३/खामकरवाडी/राधानगरी/सुयो/११२९/२०१२ दि.३०/०३/२०१२

**प्रस्तावना:-**

केंद्र पुरस्कृत वर्धित वेग कार्यक्रमांतर्गत संदर्भ क्र. १ च्या शासन निर्णयान्वये खामकरवाडी (ता.राधानगरी, जि. कोल्हापूर) नळ पाणी पुरवठा योजनेच्या रु. २६.४८ लक्ष इतक्या ढोबळ खर्चाच्या अंदाजपत्रकास प्रशासकीय मान्यता प्रदान केली होती. तथापि, जादा दराच्या निविदा, साहित्याच्या खर्चात झालेली वाढ व भूसंपादनाच्या किंमतीत वाढ इ. कारणांमुळे योजनेच्या खर्चात वाढ झाली आहे. त्यामुळे महाराष्ट्र जीवन प्राधिकरणाने संदर्भ क्र. २ च्या पत्रान्वये खामकरवाडी नळ पाणी पुरवठा योजनेच्या रू. ३१.८१ लक्ष इतक्या ढोबळ किंमतीच्या अंदाजपत्रकास सुधारित प्रशासकीय मान्यता देण्याबाबतचा प्रस्ताव शासन मान्यतेसाठी सादर केला होता. त्यानुसार खामकरवाडी नळ पाणी पुरवठा योजनेस सुधारित प्रशासकीय मान्यता देण्याचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता.

## शासन निर्णय:-

खामकरवाडी (ता. राधानगरी, जि. कोल्हापूर) नळ पाणी पुरवठा योजनेच्या रु. ३१.८१ लक्ष (रुपये एकतीस लक्ष एक्याऐंशी हजार फक्त) इतक्या सुधारित किंमतीस प्रशासकीय मान्यता देणेबाबत नियोजन व वित्त विभागास प्रस्तावित करण्यात आले होते. सदर योजनेच्या सुधारित अंदाजपत्रकामध्ये वाढीव खर्च व भाववाढ यासाठी मूळ योजनेप्रमाणे १७.५ टक्के इतका ईटीपी चार्जेस महाराष्ट्र जीवन प्राधिकरणाने गृहित धरला होता. तथापि, वित्त विभागाने वाढीव खर्च रू. २.०१ लक्ष या रक्कमेवर ९ टक्के ईटीपी चार्जेस मान्य केले असून भाववाढीच्या रू. २.५२ लक्ष या रक्कमेवर ईटीपीची तरतूद वगळलेली आहे. त्यामुळे सदर योजनेच्या रू. ३१.१९ लक्ष इतक्या ढोबळ सुधारित अंदाजपत्रकास प्रशासकीय मान्यता दर्शविली आहे.

त्यानुसार खामकरवाडी नळ पाणी पुरवठा योजनेच्या रु. ३१.१९ लक्ष (रु. एकतीस लक्ष एकोणीस हजार फक्त ) इतक्या सुधारित किंमतीस पुढील अटींच्या अधीन राहून प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे.

१) ही योजना महाराष्ट्र जीवन प्राधिकरणामार्फत कार्यान्वित करण्यात येईल.

२) उपरोक्त नमूद सुधारित अंदाजपत्रकीय किंमतीच्या मर्यादेत योजनेतील शिल्लक कामे तीन महिन्याच्या आत पुर्ण करावीत व योजनेच्या खर्चात कोणत्याही परिस्थितीत वाढ होणार नाही, याची दक्षता घेण्यात यावी.

३) या योजनेच्या मूळ प्रशासकीय मंजुरी दिलेल्या शासन निर्णयातील सूचना व तांत्रिक मान्यतेच्या आदेशातील अटी व शर्तीचे काटेकोरपणे पालन करावे.

४) सदर योजना पूर्ण झाल्यावर ती संबंधीत ग्रामपंचायत / जिल्हा परिषदेच्या ताब्यात देण्यात यावी. संबंधीत कार्यकारी अभियंता, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, योजना विभाग, कोल्हापूर यांच्यांकडून योजना प्रत्यक्षात पूर्ण झाली आहे, या आशयाची सूचना मिळाल्याच्या दिनांकापासून एक महिन्याच्या आत योजना ताब्यात घेण्यासंबंधी संबंधीत ग्रामपंचायत / जिल्हा परिषद जबाबदार राहील. योजना प्रत्यक्षात पूर्ण झाल्यावर लगेच संबंधित कार्यकारी अभियंता, जिल्हा परिषद व संबधित ग्रामपंचायतीच्या अधिका-यांनी संयुक्तपणे पहाणी आयोजित करावी आणि अशा पाहणीत कोणतेही दोष आढळून आल्यास योजना ताब्यात देण्यापूर्वी ते सुधारण्यात यावेत.

५) महाराष्ट्र ग्रामपंचायत कर व फी नियम, १९६० मधील तरतुदींनुसार आकारण्यात येणा-या पाणीपट्टीच्या आधारे योजना स्वावलंबी ठरेल हे पाहण्याची जबाबदारी संबंधित ग्रामपंचायतीची / जिल्हा परिषदेची राहील.

६) सन २०१३ मधील CAG च्या अहवालानुसार २१ टक्के पाणी पुरवठा योजना देखभाल व दुरुस्ती अभावी तसेच वीज देयके न भरल्यामुळे (poor maintenance/non payment of electricity bills) बंद असल्याचे दिसून येते. त्यामुळे सदर योजना आर्थिकदृष्टया सक्षम राहण्यासाठी पाणीपट्टी दरामध्ये आवश्यकतेनुसार वेळोवेळी वाढ करण्यात यावी.

७) सदर योजनेकरीता आवश्यक ती पाणीपट्टी ग्रामपंचायत आकारणी करून त्याची वसुली करेल, अशा आशयाचा ग्रामपंचायत खामकरवाडी यांनी ठराव पारित केल्यानंतर योजनेचे हस्तांतरण संबंधित ग्रामपंचायतीकडे करून तिचे लेखे बंद करण्यात यावे.

८) योजना पुनर्सुधारित होणार नाही, याची जबाबदारी महाराष्ट्र जीवन प्राधिकरणाची राहिल.

९) या योजनेवर होणारा रू. ४.७१ लक्ष इतका वाढीव खर्च राष्ट्रीय ग्रामीण पेयजल कार्यक्रमांतर्गत राज्य हिश्श्यातून /जिल्हा नियोजन मंडळाकडून उपलब्ध करण्यात आलेल्या अनुदानामधून भागविण्यात यावा.

हा शासन निर्णय नियोजन विभाग व वित्त विभागाच्या अनुक्रमे अनौपचारिक संदर्भ क्र. ८४/१४४३, दि. ०९ मार्च, २०१० व २६०/व्यय-३, दि.०७ एप्रिल, २०१५ अन्वये प्राप्त झालेल्या मान्यतेनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१५०६०४१७१०५०५७२८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Deelip Pandurang Patil

Digitally signed by Deelip Pandurang Patil
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Section Officer, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Deelip Pandurang Patil
Date: 2015.06.05 16:46:16 +05'30'

**(दि. पां. पाटील)**
**कक्ष अधिकारी , महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१) मा.मंत्री, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
२) मा. विधानसभा/ विधानपरिषद सदस्य (सर्व)
३) प्रधान सचिव, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई.
४) सदस्य सचिव, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, एक्सप्रेस टॉवर्स, मुंबई-२१,
५) विभागीय आयुक्त, पुणे विभाग, पुणे.
६) जिल्हाधिकारी, कोल्हापूर.
७) संचालक, भूजल सर्वेक्षण विकास यंत्रणा, पी.एम.टी.बिल्डींग स्वारगेट, पुणे.
८) मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, कोल्हापूर.
९) महालेखापाल, लेखा व अनुज्ञेयता, महाराष्ट्र -१, मुंबई / महाराष्ट्र २, नागपूर.
१०) महालेखापाल, लेखा परीक्षा, महाराष्ट्र -१, मुंबई / महाराष्ट्र २, नागपूर
११) मुख्य अभियंता तथा विशेष कार्य अधिकारी, पा.पु.व स्व.वि., यांचे स्वी.सहा. मंत्रालय, मुंबई.
१२) मुख्य अभियंता, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, पुणे.
१३) संचालक, पाणी व स्वच्छता सहाय्य संस्था, सिडको भवन, बेलापूर, नवी मुंबई
१४) संचालक (वित्त), महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, सिडको भवन बेलापूर, नवी मुंबई.
१५) अधीक्षक अभियंता, भारत निर्माण कक्ष, समन्वय व सनियंत्रण कक्ष, पुणे
१६) अधीक्षक अभियंता, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण , योजना मंडळ, सांगली.
१७) कार्यकारी अभियंता, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, योजना विभाग, कोल्हापूर.
१८) कार्यकारी अभियंता, ग्रामीण पाणी पुरवठा विभाग, जिल्हा परिषद, कोल्हापूर.

१९) जिल्हा वरिष्ठ भूवैज्ञानिक, भूजल सर्वेक्षण व विकास यंत्रणा, कोल्हापूर.

२०) वित्त विभाग (व्यय-०३) व नियोजन विभाग (कार्यासन -१४४३), मंत्रालय, मुंबई.

२१) कार्यासन क्रमांक पापु-०४,०६,०९,१०,१३ व १८ पा.पु.व स्व.वि., मंत्रालय, मुंबई

२२) निवड नस्ती पापु-१७